राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत
केंद्र शासनाकडून सन २००९-१०
मध्ये प्राप्त झालेल्या निधीचे वितरण
जलसंधारण विभाग

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.९०/राकृवियो,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : १५ एप्रिल, २०१०**

**वाचा :- २) शासन निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.१०२/राकृवियो, दि. २०.०३.२०१०**

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाने कृषि व संलग्न क्षेत्रांच्या विकास दरात वाढ करण्याकरिता अकराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत राष्ट्रीय कृषि विकास योजना हा कार्यक्रम राबविण्यास सन २००७-०८ पासून सुरुवात केली आहे. या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीतून पायाभूत सुविधांचा विकास करण्याकरिता प्रकल्प राबविले जातात. या प्रकल्पांना मंजुरी देण्याकरिता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांच्या अध्यक्षतेखाली "राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती" गठीत करण्यात आली आहे. सदरहू समितीने जलसंधारण विभागाच्या "शेततळे" या प्रकल्पास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन जलसंधारण विभागाच्या "शेततळे" या मंजूर प्रकल्पाला अतिरिक्त निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

२. उपरोक्त पार्श्वभूमीवर शासन, जलसंधारण विभागाच्या "शेततळे" या प्रकल्पास रुपये १००.०० कोटी इतका अतिरिक्त निधी केंद्र शासनाकडून सन २००९-१० मध्ये प्राप्त झालेल्या निधीतून मंजूर करीत आहे. प्रधान सचिव (कृषि) यांनी या योजनेकरिता उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेख्यात जमा करण्यात आलेल्या रक्कमेपैकी रु.१००.०० कोटी इतकी रक्कम "शेततळे" या प्रकल्पाकरिता संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना धनादेशाद्वारे अदा करावी.

३. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांच्या अनुषंगाने जलसंधारण विभाग व संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

अ) या प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याकरिता आवश्यक ती सविस्तर कार्यप्रणाली/मार्गदर्शक सूचना जलसंधारण विभागाने विहित कराव्यात.

आ) सदर निधी राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने मंजूर केलेली "शेततळे" ही योजना व केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेसंदर्भात वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन खर्च करावा.

इ) जलसंधारण विभागाने व संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरहू प्रकल्पाची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करण्यासंदर्भात आवश्यक तो समन्वय आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांच्याशी ठेवावा.

ई) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांनी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी व त्याच्या विनियोगाबाबतचा योजनानिहाय हिशोब स्वतंत्रपणे विहित केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवावा. तसेच सदरहू लेख्यांचे लेखा परिक्षण महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई यांच्याकडून करुन घ्यावे.

उ) जलसंधारण विभागास मंजूर करण्यात आलेला निधी त्यांनी तात्काळ उपयोगात आणावा.

ऊ) जलसंधारण विभागाने प्रधान सचिव (जलसंधारण) यांच्या सहीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करावे.

४. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१००४१६१८३४४२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(ग. शा. सोनावणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव(जलसंधारण ), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
आयुक्त ( कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोट्या शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे
संचालक (प्रक्रिया व व्यापारक्षम शेती) / उपसंचालक (राकृवियो), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी / सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व विभागीय कृषि सहसंचालक / सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
महालेखापाल (लेखा परिक्षा) ,महाराष्ट्र १, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
प्रधान सचिव (कृषि),यांचे स्वीय सहायक कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती